**सहायक अनुदानाच्या जलद संवितरण व संनियंत्रणासाठी ‘आभासी वैयक्तिक ठेव लेखा’ प्रणाली करिता आहरण व संवितरण अधिकारी, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना ‘आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक’ म्हणून मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -एमसीओ -२०२४/प्र.क्र.१८४ /नवि-१४**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक- १४ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ-** महाराष्ट्र शासन, वित्त विभाग यांचे शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०२३/ प्र.क्र. ११०/२०२३/कोषा प्रशा -५ दिनांक . १४ फेब्रुवारी २०२४.

**प्रस्तावना-**

संदर्भीय शासन निर्णयान्वये वित्त विभागाने सहायक अनुदानाच्या जलद संवितरण व नियंत्रणासाठी आहरण व संवितरण अधिकारी आणि अन्य शासकीय कार्यान्वयन प्राधिकारी यांचेकरिता आभासी वैयक्तीक ठेवलेखा(Virtual Personal Deposit Account) ही व्यवस्था व कार्यपद्धती लागू करण्याबाबत आदेश निर्गमित केले आहेत. सदर शासन निर्णयातील परिच्छेद ११.१ मध्ये महाराष्ट्र कोषागार नियम नमुना क्रमांक ४४ देयाकांद्वारे राज्याच्या एकत्रित निधीतून २७- लहान बांधकामे, ३१-सहायक अनुदान (वेतनेतर), ३३-अर्थसहाय्य, ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान, ५०-मोठी बांधकामे, आणि वित्त विभागाद्वारे वेळोवेळी घोषित करण्यात येतील अशा अन्य उद्देश शीर्ष (Object Head) अंतर्गत आहरित केल्या जाणाऱ्या सहायक अनुदानाच्या निधीचा विनियोग करण्यासाठी आभासी वैयक्तिक ठेव लेखा [Virtual Personal Deposit Account (VPDA)] ही व्यवस्था व कार्यपद्धती लागू करण्यास वित्त विभागाकडून मान्यता देण्यात आलेली आहे. उपरोक्त उद्देश शीर्ष (Object Head) अंतर्गत राज्याच्या एकत्रित निधीतून आहरित केल्या जाणाऱ्या सहायक अनुदानाच्या निधीचा विनियोग करण्यासाठी सर्व क्षेत्रिय आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना आणि अन्य अशासकीय कार्यान्वयन यंत्रणांना “आभासी वैयक्तिक ठेव लेखा” या व्यवस्थेचा आणि कार्यपद्धतीचा अवलंब करणे अनिवार्य करण्यात आलेले आहे.

संदर्भीय शासन निर्णयातील मुद्दा क्र.११.२ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभाग संबंधित आहरण व संवितरण अधिकारी आणि अन्य प्रशासकीय कार्यान्वयन यंत्रणाच्या बाबतीत अशा कार्यान्वयन यंत्रणेचे वित्तीय कामकाजाचे प्रभारी अधिकारी यांना वित्त विभागातील संबंधित व्यय कार्यासन आणि कोषा. प्रशा-५ कार्यासन, तसेच महालेखापाल, (ले. व अ.) कार्यालय यांच्या मान्यतेने शासन निर्णयाद्वारे “आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक” म्हणून घोषित करतील असे नमूद आहे. तसेच मुद्दा क्र. ११.३ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागाने वरीलप्रमाणे “आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक” घोषित करणेबाबत शासन निर्णय निर्गमित केल्यानंतर, त्या शासन निर्णयाच्या निर्गमन दिनांकापासून एक सप्ताहाच्या मुदतीत संबंधित आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक यांनी महालेखापाल, (ले.व अ.) यांच्या कार्यालयाकडे “आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक” म्हणून प्रत्यक्ष कामकाज करण्यासाठीचे प्राधिकार पत्र मिळविण्यासाठी प्रस्ताव सादर करावा असे नमूद आहे.

संदर्भीय शासन निर्णयातील मुद्दा क्र. ११.२ अन्वये आहरण व संवितरण अधिकारी तथा सहायक आयुक्त (लेखा), नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना “आभासी वैयक्तिक ठेव लेखा” या व्यवस्थेचा आणि कार्यपद्धतीचा अवलंब करणे करिता “आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक” म्हणून मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासाठी संदर्भीय शासन निर्णयातील मुद्दा क्र. ११.२ अन्वये वित्त विभागातील संबंधित व्यय कार्यासन आणि कोषा. प्रशा-५ कार्यासन यांची मान्यता घेतली आहे. त्यास अनुसरून शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

१. संदर्भीय शासन निर्णयान्वये आहरण व संवितरण अधिकारी तथा सहायक आयुक्त (लेखा), नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना म.को.नि. नमुना क्रमांक ४४ देयकांद्वारे राज्याच्या एकत्रित निधीतून २७- लहान बांधकामे, ३१-सहायक अनुदान (वेतनेतर), ३३-अर्थसहाय्य, ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान, ५०-मोठी बांधकामे, आणि वित्त विभागाद्वारे वेळोवेळी घोषित करण्यात येतील अशा अन्य उद्देश शीर्ष (Object Head) अंतर्गत आहरित केल्या जाणाऱ्या सहायक अनुदानाच्या निधीचा विनियोग करण्यासाठी "आभासी वैयक्तिक ठेव लेखा" [Virtual Personal Deposit Account (VPDA)] व्यवस्था आणि कार्यपद्धती लागू करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच संदर्भीय शासन निर्णयातील मुद्दा क्र. ११.२ अन्वये आहरण व संवितरण अधिकारी तथा सहायक आयुक्त (लेखा), नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक" म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

२. आहरण व संवितरण अधिकारी तथा सहायक आयुक्त (लेखा), नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना "आभासी वैयक्तिक ठेव लेखा" या व्यवस्थेचा आणि कार्यपद्धतीचा अवलंब करणे करिता "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक"म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच त्यांना अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथे "आभासी वैयक्तिक ठेव लेखा" (VPDA) उघडण्यास मंजुरी देण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी तथा सहायक आयुक्त (लेखा), नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी संदर्भीय शासन निर्णयामधील मुद्दा क्र. ११.३ अन्वये सदर शासन निर्णयाच्या निर्गमन दिनांकापासून एक सप्ताहाच्या मुदतीत महालेखापाल, (ले.व अ.) यांच्या कार्यालयाकडे "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक" म्हणून प्रत्यक्ष कामकाज करण्यासाठीचे प्राधिकार पत्र मिळविण्यासाठी प्रस्ताव सादर करावा. महालेखापाल, (ले.व अ.) यांचेकडून प्राधिकार पत्र निर्गमित झाल्यानंतर संचालनालय, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडून "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक संकेतांक" देण्यात येईल. सदर कार्यवाही प्राधान्याने पूर्ण करवून घेण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी तथा सहायक आयुक्त (लेखा), नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई व्यक्तिशः जबाबदार असतील.

३. "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रणाली" कार्यान्वित करणे आणि या प्रणाली अंतर्गत निधीचे हस्तांतरण, निधीचे संवितरण, रोख पुस्तक, ताळमेळाचे कामकाज, लेखांकन, रकमांचा विनियोग करण्यासाठी कालमर्यादा, उपयोगिता प्रमाणपत्रे सादर करणे, अखर्चित रकमांचा शासन खाती भरणा, लेखापरीक्षा, इत्यादीबाबत उपरोक्त संदर्भीय शासन निर्णय दि.१४.०२.२०२४ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. आहरण व संवितरण अधिकारी तथा सहायक आयुक्त (लेखा), नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई संदर्भीय शासन निर्णयामधील मुद्दा क्र. ११.३ अन्वये "आभासी वैयक्तिक ठेव लेखा" या व्यवस्थेचा आणि कार्यपद्धतीचा अवलंब करणे करिता व "आभासी वैयक्तिक ठेव लेखा" (VPDA) उघडण्यास. तसेच, आहरण व संवितरण अधिकारी तथा सहायक आयुक्त (लेखा), नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना "आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक" म्हणून घोषित करण्यास प्रधान महालेखापाल (ले.व अ.)-१, महाराष्ट्र, मुंबई यांनी संदर्भ क्र.TM/Ch.२/UOR no.८९/नगर विकास विभाग/२०२४-२०२५/६१५, दि.१४.०८.२०२४ अन्वये मान्यता दिली आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक १६/२०२४/कोषा प्रशा-५, दिनांक ०३.०६.२०२४ आणि अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३७६/२०२४/व्यय-३, दिनांक २९.०७.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०२४०८१४१७५१००४७२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ASHOK KASHINATH LAKKAS

Digitally signed by ASHOK KASHINATH LAKKAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=84261302514df14d17b0d46bb1422d22bfc355b1a840ece50f14894cd6b0da24, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A08E157E090DE76FD7473747C56539E08109C40C5E2E8FE638A0A32B6B0BE227, cn=ASHOK KASHINATH LAKKAS
Date: 2024.08.14 18:05:44 +05'30'

**(अ. का. लक्कस)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१). मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा. मंत्री व मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) अ.मु.स/प्र.स/सचिव, सर्व विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव, नगरविकास विभाग-१, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव नगरविकास विभाग-२, मंत्रालय, मुंबई
७) आयुक्त, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई
९) प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) २. महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१७) कार्यासन अधिकारी, (व्यय-५/कोषा प्रशा-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१८) नगरविकास विभागातील सर्व कार्यासने, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९) निवड नस्ती